"निर्यातीस चालना देण्यासाठी पायाभूत सुविधांचा विकास करण्यासाठी राज्य शासनास सहाय्य करणे" (ASIDE) या योजनेच्या अनुषंगाने नवीन संगणक सांकेतांक घेणेबाबत

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग
शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१४/प्र.क्र.१५५/उद्योग-७,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक १० जुन, २०१५.

वाचा:-

१) केंद्र शासनाच्या वाणिज्य मंत्रालयाने प्रसृत केलेल्या असाईड योजनेच्या मार्गदर्शक सूचना.
२) उ.ऊ.व का. वि. शासन निर्णय क्र. असाईड-१००२/प्र.क्र.११७/उद्योग-१२, दिनांक १४.६.२००२.
३) उ.ऊ.व का. वि. शासन निर्णय क्र. असाईड-१००२/प्र.क्र.१३३/उद्योग-१२, दिनांक २९.६.२००२.
४) उ.ऊ.व का. वि. शासन निर्णय क्र. असाईड-१००३/प्र.क्र.५/उद्योग-१२, दिनांक १२.५.२००३.
५) उ.ऊ.व का. वि. शासन निर्णय क्र. असाईड-१००२/प्र.क्र.१३३/उद्योग-१२, दिनांक २०.५.२००३.
६) वित्त विभाग यांचे अर्धशासकीय पत्र क्र. संकीर्ण-२०१४/प्र.क्र.८/अर्थ-४, दिनांक ५.५.२०१४

प्रस्तावना :-

" निर्यातीस चालना देण्यासाठी पायाभूत सुविधांचा विकास करण्यासाठी राज्य शासनास सहाय्य करणे" (Assistance to States for infrastructure Development for Export & other Allied Activities - ASIDE) या १०० % केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत राज्यातील निर्यातीच्या क्षेत्रातील कामगिरी व निर्यातीच्या वाढीचा दर विचारात घेऊन या योजनेंतर्गत निर्यातीकरिता पायाभूत सुविधांचा विकास करण्यासाठी राज्य शासनास निधी उपलब्ध करुन देण्यांत येतो. सदर योजनेसाठी प्राप्त होणाऱ्या अर्थसहाय्यातून निर्यात प्रचालनासाठीचे प्रकल्प राज्यातील उद्योगांच्या निर्यातवृध्दीसाठी पायाभूत सुविधांमधील कमतरता व अडचणी दूर करण्यासाठी या योजनेतील मदतनिधी वापरण्यात येतो. केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला निधी परस्पर महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडे जमा केला जात आहे.

सन २०१२-१७ या पंचवार्षिक योजनेच्या धोरणात समाविष्ट असलेल्या या केंद्र पुरस्कृत योजनेकरिता सदर योजनेसंदर्भात विभागाच्या दिनांक २९.६.२००२ च्या शासन निर्णयान्वये मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या राज्यस्तरीय निर्यात प्रचालन समितीमार्फत

सनियंत्रण केले जाते. सदर राज्यस्तरीय निर्यात प्रचालन समितीमध्ये विकास आयुक्त, सीप्झ, मुंबईयांची सदस्य म्हणून नेमणूक दिनांक २०.५.२००३ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आलेली आहे. तसेच विकास आयुक्त (उद्योग) यांची महाराष्ट्र राज्याचे "निर्यात आयुक्त" म्हणून विभागाच्या दिनांक १२.५.२००३ च्या शासन निर्णयान्वये नियुक्ती करण्यात आलेली आहे.

राज्य शासनामार्फत केंद्र शासनाकडून निधी प्राप्त करण्यासाठी तसेच सदर योजनेंतर्गत प्रकल्पांस राज्यस्तरीय निर्यात प्रचालन समितीची मान्यता मिळाल्यानंतर प्रकल्पाची अंमलबजावणी करणाऱ्या संबंधित संस्थेला निधी वितरीत करण्यासाठी राज्यातील "नोडल एजन्सी" म्हणून "महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ" यांची तसेच या योजनेचे संनियंत्रण करण्यासाठी, ' नोडल अधिकारी' म्हणून 'अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय' यांची विभागाच्या दिनांक १४.६.२००२ च्या शासन निर्णयान्वये नियुक्ती करण्यात आलेली आहे.

आता, वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ५ नुसार केंद्र शासनाने बी. के. चतुर्वेदी समितीच्या शिफारशी स्विकारलेल्या असून त्यानुसार सर्व केंद्र पुरस्कृत योजनांची पुर्नरचना ६६ केंद्र पुरस्कृत योजनांमध्ये करण्यात आलेली आहे. त्यानुसार अर्थसंकल्प बाहय केंद्रपुरस्कृत योजनांचा निधी राज्याच्या एकत्रित निधीद्वारे वितरित होणार असल्याने सदरचा निधी एका विशिष्ट लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यासाठी सदर योजनेसाठी संगणक सांकेतांक घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासन पुरस्कृत " निर्यातीस चालना देण्यासाठी पायाभूत सुविधांचा विकास करण्यासाठी राज्य शासनास सहाय्य करणे" (Assistance to States for infrastructure Development for Export & other Allied Activities -ASIDE) या योजनेसाठी खालीलप्रमाणे नवीन लेखाशिर्ष व व आठ अंकी संगणक सांकेतांक घेण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

| योजनेचे नाव | मराठी लेखाशिर्ष | इंग्रजी लेखाशिर्ष |
|---|---|---|
| निर्यातीस चालना देण्यासाठी पायाभूत सुविधांचा विकास करण्यासाठी राज्य शासनास सहाय्य करणे (असाईड) | के-१०<br>४८७५-इतर उद्योगावरील भांडवली खर्च<br>६०, इतर उद्योग<br>००४, संशोधन आणि विकास<br>(००) (०१) निर्यातीस चालना देण्यासाठी पायाभूत सुविधांचा विकास करण्यासाठी राज्य | K-10<br>4875-Capital outlay on other Industries<br>60, Other Industries<br>004, Research and Development |

| | | |
|---|---|---|
| Assistance to States for Infrastructure Development for Exports (Aside) | शासनास सहाय्य करणे (असाईड) (१००% केंद्र पुरस्कृत) (योजनांतर्गत) (४८७५ ००३४ ) दत्तमत. | (00) (01) Assistance to States for Infrastructure Development for Exports (Aside) (Plan Scheme) (100% Centrally Sponsored) (4875 0034) (Voted). |

२. सदर योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त होणारा निधी उक्त नमूद लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय प्रधान महालेखापाल कार्यालय (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई यांचे क्रमांक ख.वि./चा-१/उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग/ युओआर-१५२/२०१४-१५/११२३, दिनांक ३०.१.२०१५ व ख.वि./चा-१/उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग/युओआर-५/२०१४-१५/१५८, दिनांक २८.४.२०१५ ची पत्रे आणि नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २२/१४६१, दिनांक २४.२.२०१५ अन्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २३३/१५/व्यय-१६, दिनांक २०.५.२०१५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१५०६१०१६४२०५५६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industry Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2015.06.10 17:45:32 +05'30'

**( संजय देगांवकर )**

शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१. मा. अध्यक्ष, विधानसभा/परिषद यांचे खाजगी सचिव.
२. मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव.

४. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा/परिषद) यांचे खाजगी सचिव.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१०. सह सचिव(राज्य कक्ष), वाणिज्य व उद्योग मंत्रालय, नवी दिल्ली.
११. संयुक्त महानिदेशक, विदेश व्यापार, मुंबई.
१२. विकास आयुक्त (सिप्झ), मुंबई.
१३. विकास आयुक्त (उद्योग, उद्योग संचालनालय, मुंबई.
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी , महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
१५. व्यवस्थापकीय संचालक, सिडको, लि., नवी मुंबई.
१६. मुख्य कार्यकारी अधिकारी, मेरिटाईम बोर्ड, मुंबई.
१७. व्यवस्थापकीय संचालक, रस्ते विकास महामंडळ, मुंबई.
१८. व्यवस्थापकीय संचालक, मिटकॉन कन्सलटन्सी सर्व्हिसेस लि.
१९. अध्यक्ष, (पश्चिम विकास), फेडरेशन ऑफ इंडियन एक्सपोर्ट ऑर्गनायझेशन, मुंबई.
२०. नियोजन विभाग, का.१४६१, मंत्रालय, मुंबई.
२१. वित्त विभाग, व्यय-१६/अर्थ-१४, मंत्रालय, मुंबई
२२. विभागातील सर्व कार्यासने.
२३. कार्यासन अधिकारी, प्रशासन-१, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४. निवड नस्ती, उद्योग-७, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.